ज्येष्ठतासूची मधील समावेशाबाबत
श्री.र.ई.गिरी, कक्ष अधिकारी

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण १२१८/प्र.क्र.७६/१४-ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०००३२.
दिनांक : १ नोव्हेंबर, २०१८.

वाचा :- १) सा.प्र.वि. आदेश क्रमांक संकीर्ण १२१८/प्र.क्र.७६/१४-ब, दिनांक ०६.०९.२०१८
२) शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण १२१८/प्र.क्र.७६/१४-ब, दिनांक ०४.१०.२०१८
३) शासन परिपत्रक क्रमांक कअप १२१७/प्र.क्र.६९/१४-ब, दिनांक २४.०५.२०१७

**शासन परिपत्रक**

संदर्भाधीन शासन आदेश क्रमांक १ अन्वये श्री.र.ई.गिरी यांना कक्ष अधिकारी पदावरील नियमित पदोन्नतीचा व ज्येष्ठतेचा २३.०७.२००५ हा दिनांक देण्यात आला आहे. सदर आदेशास अनुसरुन संदर्भाधीन क्रमांक २ येथील शासन परिपत्रकान्वये दिनांक १ जानेवारी रोजीच्या सन २००६ ते २०१० या कालावधीतील कक्ष अधिकारी संवर्गाच्या अंतिम ज्येष्ठतासूच्यांमध्ये श्री.र.ई.गरी, कक्ष अधिकारी यांच्या नावाचा समावेश करुन त्यांना ज्येष्ठता क्रमांक देण्यात आला आहे.

२. संदर्भ क्रमांक ३ येथील शासन परिपत्रकान्वये दिनांक १ जानेवारी रोजीच्या सन २०११ ते २०१५ या कालावधीतील कक्ष अधिकारी संवर्गाच्या सुधारित तात्पुरत्या सामायिक ज्येष्ठतासूच्या प्रसिध्द करण्यात आल्या आहेत. या ज्येष्ठतासूच्यांमध्ये श्री.र.ई.गिरी यांच्या नावाचा समावेश करण्यात येत असून, या ज्येष्ठतासूच्यांमध्ये श्री.गिरी यांचा ज्येष्ठता क्रमांक खालील विवरणपत्रामध्ये (स्तंभ १ ते ४) दर्शविल्याप्रमाणे राहील.

| कक्ष अधिकाऱ्याचे नाव : **श्री.र.ई.गिरी** | | | |
|---|---|---|---|
| ज्येष्ठता दिनांक : **२३.०७.२००५** | | | |
| **ज्येष्ठता सूची वर्ष** | **अनुक्रमांक** | **ज्येष्ठता यादीतील क्रमानंतर** | **ज्येष्ठता यादीतील क्रमापूर्वी** |
| १ | २ | ३ | ४ |
| **२०११** | २७३-अ | श्री. प्र.ता.घोलप यांच्या नंतर | श्री. प्र.ग.घोंक्षे यांच्या पूर्वी |
| **२०१२** | २१०-अ | | |
| **२०१३** | १५७-अ | | |
| **२०१४** | १२४-अ | | |
| **२०१५** | ५८-अ | | |

३. मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे रिट याचिका क्र.२९८२/२०००, क्र.२९८६/२०००, क्र.४९५८/२००३ व क्र.३३७४/२०११ मा.उच्च न्यायालयाने दिनांक ०६.०८.२०१८ रोजी निकाली काढल्या असून, मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयानुसार दिनांक ०१.०१.१९८६ पासूनच्या कक्ष अधिकारी संवर्गाच्या ज्येष्ठतासूच्या पुनर्विलोकीत कराव्या लागणार आहेत. मा.उच्च न्यायालयाच्या दिनांक ०६.०८.२०१८ रोजीच्या निर्णयासंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुमती याचिका (SLP) क्र.२५१८१/२०१८ दाखल करण्यात आली असून, यावर दिनांक ०१.१०.२०१८ रोजी झालेल्या सुनावणीत मा.सर्वोच्च न्यायालयाने मा. उच्च न्यायालयाच्या दि.०६.०८.२०१८ रोजीच्या आदेशास स्थगिती दिलेली नाही. यास्तव सदर आदेश मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल विशेष अनुज्ञा याचिकेच्या अधिन राहून तसेच या संदर्भात मा. महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण / मा.

उच्च न्यायालय अथवा मा. सर्वोच्च न्यायालयाने काही आदेश पारित केले तर त्यास अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक २०१८११०२१०५६११७००७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a80217 98a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5d c2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2018.11.02 11:01:36 +05'30'

**( ग. भि. गुरव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री.र.ई.गिरी, कक्ष अधिकारी, कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. सहसचिव/उपसचिव (आस्थापना), कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३. सामान्य प्रशासन विभाग, का.क्र.१४
४. निवडनस्ती